“सेवाग्राम विकास आराखडा”; जिल्हा, वर्धा.
निधी वितरणाबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांक-सेविआ २०१८/प्र.क्र.१/का.१४४३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ०४ जानेवारी, २०१९

**वाचा :** नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. सेविआ २०१८/प्र.क्र.६८/का.१४४४, दिनांक १० ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना :**

सेवाग्राम, जिल्हा वर्धा परिसरात पायाभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी सेवाग्राम विकास आराखड्यातील रु.१६२.५१२७ कोटी किंमतीच्या कामांना संदर्भाधीन दिनांक १० ऑक्टोबर,२०८ च्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

सेवाग्राम विकास आराखड्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु. २६.०८१२ कोटी निधी अर्थसंकल्पित आहे. या आराखड्याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी जिल्हाधिकारी, वर्धा यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सेवाग्राम, जिल्हा वर्धा परिसरात पायाभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी सेवाग्राम विकास आराखड्यांतर्गत खालील बाबींसाठी जिल्हाधिकारी, वर्धा यांना रु.१८.२५६८ कोटी (रुपये अठरा कोटी पंचवीस लाख अडुसष्ट हजार फक्त) निधी उद्दिष्टनिहाय खालील प्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दिष्ट | सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी ७०% च्या मर्यादेत वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २८-व्यावसायिक सेवा | १,१४,६८,००० | ८०,२८,००० |
| २ | ५३-मोठी बांधकामे | २४,९३,४४,००० | १७,४५,४०,००० |
| एकूण | | **२६,०८,१२,०००** | **१८,२५,६८,०००** |

२. सदरहू खर्च मागणी क्रमांक ओ-१०, ४५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, १०२-सामुहिक विकास, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१)-बहुउद्देशिय कार्यक्रम, (०१)(४२)-सेवाग्राम विकास योजना, जिल्हा वर्धा (४५१५०८६१) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. वर नमुद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या **खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.**

**३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०४१२१३२६४९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidya Hampayya

Digitally signed by Vidya Hampayya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, cn=Vidya Hampayya
Date: 2019.01.04 12:19:54 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,

विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर,
जिल्हाधिकारी, वर्धा

**प्रत :**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) सर्व सन्माननीय संसद सदस्य /विधानसभा/ विधान परिषद सदस्य,
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१०) वित्त विभाग (व्यय-८), (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई
११) जिल्हा नियोजन अधिकारी, वर्धा
१२) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४, मंत्रालय, मुंबई